शासकीय कंत्राटासाठी वस्तु
व सेवाकराबाबत.

# महाराष्ट्र शासन

## जलसंपदा विभाग

### शासन परिपत्रक क्र. टीडीएस-०९१८/प्र.क्र.५९०/२०१८/मोप्र-१

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०३, मार्च २०२३

**वाचा :**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.जीएसटी १०१७/प्र.क्र.८१/कराधान-१, दि.१९/८/२०१७
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.जीएसटी १०१७/प्र.क्र.१५५/कराधान-१, दि.११/९/२०१७
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.संकिर्ण २०१८/प्र.क्र.१४४/२०१८/कोषा प्रशा-५, दि.२८/९/२०१८
४) शासन परिपत्रक, जलसंपदा विभाग क्र.टीडीएस-०९१८/(प्र.क्र.५९०/१८)/मोप्र-१, दि.१३/११/२०१८
५) शासन परिपत्रक, जलसंपदा विभाग क्र.टीडीएस ०९१८/(प्र.क्र.५९०/१८)/मोप्र-१, दि.२८/११/२०१९
६) Government of India, Ministry of Finance Notification No.११/२०१७, Central Tax (Rate), दि.२८/०६/२०१७
७) शासन अधिसूचना, वित्त विभाग क्र.MGST १०१७/CR १०३(१०)/Taxation, दि.२९/०६/२०१७
८) Government of India, Ministry of Finance Notification No.२०/२०१७, Central Tax (Rate), दि.१९/०९/२०१७
९) वस्तु व सेवा कर अधिनियम - २०१७
१०) Government of India, Ministry of Finance Notification No.१५/२०२१, Central Tax (Rate) दि.१८/११/२०२१
११) शासन अधिसूचना, वित्त विभाग क्र.१०२१/ CR -१०८ A/Taxation-१, दि.०३/१२/२०२१
१२) Government of India, Ministry of Finance Notification No.०३/२०२२, Central Tax (Rate), दि.१३/०७/२०२२
१३) शासन अधिसूचना, वित्त विभाग क्र. GST १०२२/CR ३४/Taxation, दि.०८/०८/२०२२

**प्रस्तावना :**

"एक देश एक कर" या संकल्पनेतून देशभरात व राज्यात दि.०१/०७/२०१७ पासून वस्तू व सेवा कर लागू करण्यात आला आहे. वस्तू व सेवा कराची चालू व नवीन कामांच्या कंत्राटांच्या बाबतीत कशाप्रकारे अंमलबजावणी करावी, याबाबत वित्त विभागाने संदर्भ क्र.१ ते ३ च्या परिपत्रकान्वये तर जलसंपदा विभागाने संदर्भ क्र.४ व ५ च्या परिपत्रकान्वये स्पष्टीकरणे प्रसिध्द केली आहेत.

आता संदर्भ क्र.६ व ७ नूसार अधिसूचित केलेल्या शासकीय कार्यकंत्राटाबाबतच्या काही तरतुदी संदर्भ क्र.१० ते १३ मधील अधिसूचनेद्वारा सुधारीत करण्यात आल्या आहेत. जलंसपदा विभागाच्या अंतर्गत काही कार्यालये शासनाच्या नियंत्रणाखाली आहेत. परंतू बहुतांश कार्यालये स्वतंत्र अधिनियमाद्वारे स्थापित महामंडळांच्या अंतर्गत कार्यरत आहेत. उपरोक्त अधिसूचनेमध्ये शासन (Government) व शासनाच्या अंतर्गत काम करणारी महामंडळे (Government Entity) यांचेसाठी काही तरतूदी भिन्न आहेत..

<u>परिपत्रक :-</u>

आता वरील बाबी विचारात घेऊन वस्तु व सेवा करासाठी खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

**अ) जलसंपदा विभागाच्या महामंडळांतर्गत असलेल्या कामासांठी**

१. **महामंडळांतर्गत स्वीकारण्यात येणाऱ्या कार्यकंत्राट सेवांसाठी संदर्भ क्र.१० व ११ मधील अधिसूचनेनूसार दिनांक १ जानेवारी २०२२ पासून वस्तु व सेवा कराचा दर १८ टक्के घेण्यात यावा.**

२. संदर्भ क्र.१० व ११ मधील अधिसूचनेसार महामंडळांतर्गत स्वीकारण्यात येणाऱ्या कार्यकंत्राट सेवांसाठी वस्तु व सेवा कराच्या दरामध्ये दिनांक १ जानेवारी २०२२ पासून बदल करण्यात आला आहे. त्यामुळे दि.१ जानेवारी २०२२ रोजी चालू असलेल्या कामासाठीचे देयक अदा करताना वस्तु व सेवा कर अधिनियम २०१७ मधील कलम १४ नुसार कार्यवाही करण्यात यावी.

३. कंत्राटदारास देयके अदा केल्यानंतर वस्तु व सेवा कराची प्रतिपूर्ती (reimbursement) संदर्भ क्र.४ मधील शासन परिपत्रकातील नमूद सुचनांनूसार करण्यात यावी. वस्तू व सेवा कराच्या करभिन्नतेमुळे वस्तू व सेवा कराचा निम्न दर असताना कार्यकंत्राटदाराने जर उच्च दराने रक्कम वस्तू व सेवा कर विभागास भरुन त्याची प्रतिपूर्ती (reimbursement) महामंडळाकडून प्राप्त केली व तद्नंतर अशा निम्नदर व उच्च दरातील फरकाचा परतावा (refund) वस्तू व सेवा कर विभागाकडून प्राप्त केल्यास उक्त फरकाची रक्कम ही अतिप्रदान समजून महामंडळास परत करण्याची जबाबदारी कंत्राटदाराची राहील. यासाठीचे आवश्यक बंधपत्र कंत्राटदाराकडून घेण्यात यावे.

**ब) जलसंपदा विभागाच्या अधिपत्याखालील महामंडळांव्यतिरिक्त येणाऱ्या शासकीय यंत्रणांतर्गत असलेल्या कामांसाठी**

जलसंपदा विभागांतर्गत जी कार्यालये महामंडळाच्या अंतर्गत नसून शासनाच्या नियंत्रणाखाली आहेत (उदा.यांत्रिकी तसेच विद्युत यंत्रणा, महासंचालक मेरी यांच्या अंतर्गत असलेली कार्यालये, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय इ.) त्यांनी खालील प्रमाणे कार्यवाही करावी.

१. शासनामार्फत स्वीकारण्यात येणाऱ्या कार्यकंत्राट सेवांसाठी संदर्भ क्र.१२ व १३ मधील अधिसूचनेनूसार दिनांक १८ जूलै २०२२ पासून वस्तु व सेवा कराचा दर १८ टक्के घेण्यात यावा.

२. ज्या कामांमध्ये मातीकामाची किंमत ७५ % पेक्षा जास्त आहे अशा कामांसाठी दिनांक १८ जूलै २०२२ पासून वस्तु व सेवा कर १२% घेण्यात यावा.

३. संदर्भ क्र.१२ व १३ मधील अधिसूचनेनुसार शासनामार्फत स्वीकारण्यात येणाऱ्या कार्यकंत्राट सेवांसाठी वस्तू व सेवा कराच्या दरामध्ये दिनांक १८ जुलै २०२२ पासून बदल करण्यात आला आहे. त्यामुळे १८ जुलै २०२२ रोजी चालू असलेल्या

कामांसाठीचे देयक अदा करताना वस्तु व सेवा कर अधिनियम २०१७ मधील कलम १४ नुसार कार्यवाही करण्यात यावी.

४. कंत्राटदारास देयके अदा केल्यानंतर वस्तु व सेवा कराची प्रतिपूर्ती (reimbursement) संदर्भ क्र.४ मधील शासन परिपत्रकातील नमूद सुचनांनूसार करण्यात यावी. वस्तू व सेवा कराच्या करभिन्नतेमुळे वस्तू व सेवा कराचा निम्न दर असताना कार्यकंत्राटदाराने जर उच्च दराने रक्कम वस्तू व सेवा कर विभागास भरुन त्याची प्रतिपूर्ती (reimbursement) जलसंपदा विभागाकडून प्राप्त केली व तद्‌नंतर अशा निम्नदर व उच्च दरातील फरकाचा परतावा (refund) वस्तू व सेवा कर विभागाकडून प्राप्त केल्यास उक्त फरकाची रक्कम ही अतिप्रदान समजून जलसंपदा विभागास परत करण्याची जबाबदारी कंत्राटदाराची राहील. यासाठीचे आवश्यक बंधपत्र कंत्राटदाराकडून घेण्यात यावे.

**क)** विभागांतर्गत कंत्राटांचे अंतिम देयक करतांना कंत्राटदाराने कंत्राटाचे सुरुवातीपासून विभागात भरणा केलेला वस्तु व सेवा कर, त्यामधून मिळवलेल्या प्रतिपूर्तीची रक्कम व कंत्राटदारास जलसंपदा विभागाने वस्तु व सेवा करापोटी अदा केलेली रक्कम याचा सर्व ताळमेळ वरिष्ठ सनदी लेखापाल यांचे कडून प्रमाणित करून घ्यावे व तदनंतर सबंधीत कार्यकारी अभियंता यांनी अंतिम देयक अदा करावे.

**ड)** वस्तु व सेवा कर (GST) परतावा/वसुलीसाठीच्या कार्यपध्दतीबाबत शासनाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनांचा अवलंब करुन भारत सरकार, अर्थ मंत्रालय तसेच वित्त विभाग, महाराष्ट्र शासन यांचेद्वारे वस्तु व सेवा कर दराबाबत वेळोवेळी निर्गमित/प्रचलित अधिसूचनांतील तरतुदी तसेच निविदेतील अटी शर्तीनुसार विहित कार्यपध्दतीने कार्यवाही करण्यात यावी. यापुढे वस्तु व सेवा कराच्या दराबाबत स्वतंत्र सुचना निर्गमित करण्यात येणार नाहीत.

सदर परिपत्रक वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०२३०३०३१७२३०९११२७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRASAD RAMCHANDRA NARVEKAR

Digitally signed by PRASAD RAMCHANDRA NARVEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT,
2.5.4.20=a6ed48fac9cffe22f8b946d38d8e2e2fa82aaab527c88c93f7b0dbdb50f0b562, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=33920684CC4219BA0C032228E6FCB8E71C1AD22733A9255E354DE8029E9E8160, cn=PRASAD RAMCHANDRA NARVEKAR
Date: 2023.03.03 17:27:41 +05'30'

**(प्रसाद नार्वेकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
२. मा. उपमुख्यमंत्री (जलसंपदा) यांचे प्रधान सचिव, उपमुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
३. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

५. अप्पर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. सर्व कार्यकारी संचालक, पाटबंधारे विकास महामंडळे, जलसंपदा विभाग
८. महालेखापाल- १/२, मुंबई/नागपूर.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/नागपूर.
१०.सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग
११.उप सचिव(मोप्र-१), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.कार्यासन मोप्र-१, संग्रहार्थ.